**नगर विकास विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील नविन पदनिर्मितीस मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदनि-१०२१/प्र.क्र.२३४/नवि-०३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०६ जानेवारी, २०२२

**वाचा :-**

१. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.इएसटी-२५०१/३३५२/प्र.क्र.४३६/०१/नवि-३(आस्था), दि.१०.११.२००३
२. नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.नविवि-१०१२/प्र.क्र.१५०/नवि-०३, दि.४.७.२०१६
३. उच्चस्तर सचिव समितीचे कार्यवृत्त क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.५९/२१/आपुक, दि.१३.१०.२०२१

**प्रस्तावना :-**

राज्यातील वाढत्या नागरीकरणामुळे नगर विकास विभागाकडील कामाचा ओघ दिवसेंदिवस वाढत आहे. तसेच नगर पंचायतीच्या संख्येमध्ये मोठी वाढ झाली असून नव्याने नगर प्राधिकरणांची स्थापना झाली आहे. सबब, नगर विकास विभागांतर्गत नगर रचना कक्षाकडील महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील तरतूदीनुसार तांत्रिक स्वरुपाचे कामकाज हाताळण्यासाठी उप सचिव पदाच्या समकक्ष असणारे उप सचांलक, नगर रचना तथा उप सचिव संवर्गातील १ पद तसेच अवर सचिव पदाच्या समकक्ष असणारे सहायक संचालक, नगर रचना तथा अवर सचिव संवर्गातील २ पदे अशी एकूण ३ नवीन पदे निर्माण करण्यास उच्च स्तरीय सचिव समितीने सहमती दर्शविली आहे. तद्नंतर मा. मंत्रीमंडळानेही दि.१५.१२.२०२१ च्या मंत्रीमंडळ बैठकीत उप संचालक तथा उप सचिव संवर्गातील पद निर्मित करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नगर विकास विभागांतर्गत होत असलेली नवनगर प्राधिकरणांची स्थापना, वाढत्या शहरांचे विकास आराखडे विचारात घेता, नगर रचना कक्षासाठी नगर विकास विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवर खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार उप संचालक,नगर रचना तथा उप सचिव व सहायक संचालक,नगर रचना तथा अवर सचिव संवर्गातील नवीन पदे मंजूर करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पद | मंजूर पदसंख्या | वेतन संरचना |
|---|---|---|---|
| १ | उप संचालक ,नगर रचना तथा उप सचिव | १ | एस-२५ : ७८८००-२०९२०० |
| २ | सहायक संचालक नगर रचना तथा अवर सचिव | २ | एस-२३ : ६७७००-२०८७०० |
| **एकूण** | | **३** | |

उपरोक्त पदे ही संचालक, नगर रचना यांच्या आस्थापनेवरील असल्याने, नगर विकास विभागाच्या नवि-२७ कार्यासनामार्फत शासन मान्यतेने भरण्यात येतील.

**०२.** सदर पदांचे वेतन व भत्ते मागणी **"मागणी क्रमांक एफ-३, २२५१, सचिवालय-सामाजिक सेवा, ०९०, सचिवालय, (००)(००)(०१) नगर विकास विभाग-(२२५१००९८), ०१ वेतन"** या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येऊन उपलब्ध असलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०३.** सदर शासन निर्णय उच्च स्तरीय सचिव समितीच्या ७ व्या बैठकीचे कार्यवृत्त क्र. पदनि-२०२१/ प्र.क्र.५९/२१/आपुक, दि.१३.१०.२०२१ तसेच वित्त विभाग (आपुक) अनौपचारीक संदर्भ क्र.२७ दिनांक ०४.०१.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०६१५२५५१८८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.01.06 17:28:16 +05'30'

**( विजय चौधरी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
४. मा. मंत्री, नगर विकास ,मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री, नगर विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.

६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव (वि.सु.) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई/नागपूर
१३.महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, मुंबई/नागपूर
१४.सहसंचालक, लेखा व कोषागारे,नवीन प्रशासन भवन,मंत्रालय,मुंबई.
१५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७.उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कक्ष अधिकारी (नवि-५),नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई (०३ प्रती)
१९. निवड नस्ती (नवि-३).